**विमानचालन संचालनालयाच्या आस्थापनेवरील अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्यास मान्यता देण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्र. विचासं १११४/प्र.क्र.२९/२८-अ**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०८ मार्च, २०१७.

वाचा:- १) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.असंक-१००४/प्र.क्र.१२ (भाग-२)/२००४/वि.सु.-१, दि.४.१०.२००४.
२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एव्हीएन १००८/प्र.क्र.५२६/का.२८-अ, दि.१२.३.२०१०.
३) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एव्हीएन १००८/प्र.क्र.५२६/का.२८-अ, दि.२२.२.२०११.
४) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.विचासं १११४/प्र.क्र.२९/का.२८-अ, दि.६.१.२०१६.
५) उप संचालक, विमानचालन संचालनालय यांचे क्र.डीए/एडीएस/१२४१/२०१६, दि.१५.१०.२०१६ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

संदर्भ क्र.२ च्या शासन निर्णयान्वये विमानचालन संचालनालयाच्याआस्थापनेवर एकूण २५ पदांचा आकृतिबंध मंजूर करण्यात आला आहे. तेव्हा २५ पैकी केवळ ९ पदे स्थायी स्वरूपाची होती. तद्नंतर संदर्भ क्र.३ च्या शासन निर्णयान्वये उर्वरीत १६ पैकी ११ अस्थायी पदांना स्थायी करण्यात आले. संदर्भ क्र.१ च्या अधिन राहून संदर्भ क्र.४ च्या शासन निर्णयानवये उर्वरीत ५ अस्थायी पदे संचालक, विमानचालन (वर्ग-१) व वैमानिक (वर्ग-१), पोलिस कॉन्स्टेबल (वर्ग-३)-१, शिपाई (वर्ग-४)-१ आणि स्वच्छक (वर्ग-४)-१ अशा एकूण ५ पदांना दिनांक १.३.२०१६ ते दिनांक २९.२.२०१७ पर्यंत मुदत वाढ देण्यात आली आहे. तद्नंतर उप संचालक, विमानचालन संचालनालय यांनी संदर्भ क्र.५ च्या पत्रान्वये सदर अस्थायी पदांना दिनांक १.३.२०१६ ते दिनांक २८.२.२०१७ पर्यंत मुदत वाढ देण्याची विनंती केली आहे. सबब सदर पाच पदांना मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

संचालक विमानचालन संचालनालय, मुंबई यांच्या कार्यालयाच्या आस्थापनेवरील सोबत जोडलेल्या प्रपत्र अ मधील स्तंभ ६ मध्ये नमूद केलेली संचालक, विमानचालन (वर्ग-१)-१, वैमानिक (वर्ग-१)-१, पोलिस कॉन्स्टेबल (वर्ग-३)-१, शिपाई (वर्ग-४)-१ आणि स्वच्छक (वर्ग-४)-१ अशा एकूण ५ पदांना दिनांक १.३.२०१७ ते दिनांक २८.२.२०१८ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर पाच अस्थायी पदांच्या वेतन व भत्ते या प्रित्यर्थचा खर्च मागणी क्र.ए-४, २०७० इतर प्रशासकीय सेवा, ११४ परिवहन साधनांची , खरेदी व परिरक्षण, (००)(०२) शासनाचे विमानचालन विषयक सल्लागार, (संगणक संकेतांक २०७०० १५६) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व संबंधित वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदरचा शासन निर्णय वित्त विभाग क्र.असंक-१००४/प्र.क्र.१२ (भाग-२)/२००४/वि.सु.-१, दिनांक ४.१०.२००४ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन त्याचा संगणक संकेतांक २०१७०३०८१५५७३०६६०७ असा आहे. हा आदेश डीजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dilip P. Deshmukh

Digitally signed by Dilip P. Deshmukh
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=89b94ecffd8918a2710a5d1d74df9831b69f2b6f91aaf28f5f7e4afef961baa1, cn=Dilip P. Deshmukh
Date: 2017.03.08 15:57:14 +05'30'

(दि .प्र. देशमुख)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. संचालक/ उप संचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई.
२. महालेखपाल (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखा परिक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
५. वित्त विभाग (व्यय-४/अर्थ-१९/वित्तीय सुधारणा) मंत्रालय, मुंबई.
६. सामान्य प्रशासन विभाग / कार्या.२५, मंत्रालय, मुंबई.
७. निवडनस्ती, सा.प्र.वि. कार्या.२८-अ.